राज्याच्या अतिमहत्वाच्या व्यक्तींकरीता नवीन
हेलिकॉप्टर खरेदी करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्र.विचासं-१११८/प्र.क्र.७९/२८-अ,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक: ११ सप्टेंबर, २०१८

वाचा : १) शासन निर्णय क्र.विचासं-१११८/प्र.क्र.७९/२८-अ, दि.८.०५.२०१८
२) शासन शुध्दीपत्रक क्र.विचासं-१११८/प्र.क्र.७९/२८-अ, दिनांक २७/७/२०१८
३) संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई यांचे पत्र क्र.डीए/एडीएम/८८३/२०१८,दिनांक ५/९/२०१८

**शासन शुध्दीपत्रक**

संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासनाच्या अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या हवाई प्रवासाकरीता सिर्कोस्की हेलिकॉप्टरर्स या कंपनीकडून S७६ D हे हेलिकॉप्टर खरेदी करण्यासंदर्भात शासन निर्णय जारी करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.१, २ , ३ व ४ मध्ये परकीय चलनात झालेल्या दरातील वाढीनुसार खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| परिच्छेद क्रमांक | दि.०८ मे, २०१८ च्या शासन निर्णयात नमूद दर US$ १ = रुपये ७० | शुध्दीपत्रकातील प्रस्तावित दर US$ १ = रुपये ८० त्याऐवजी वाचावे |
|---|---|---|
| १ | "हेलिकॉप्टर खरेदी करणेबाबत विमानचालन संचालनालयाने केलेल्या निविदा प्रक्रियेतील विहीत अटी व शर्तीनुसार अमेरिका येथील सिर्कोस्की इंटरनॅशनल ऑपरेशन, आयएनसी (लॉकहीड मार्टिन ची कंपनी) ६९०० मेन स्ट्रीट, पी.ओ.बॉक्स ९७२९ स्ट्रेटफोर्ड, कनेक्टीकट ०६६१५, यु.एस.ए. या उत्पादक कंपनीकडून S७६-D हे नवीन हेलिकॉप्टर टुल्ससहीत खरेदी करण्यासाठी व याप्रित्यर्थ एकूण यु.एस.डॉलर $१,८१,५८,८२५/- शी समतूल्य विनिमय दराने अंदाजे ($ १ = रु.७०/-) रु. १२७.११ कोटी (प्रचलित दरानुसार) खर्चास मंजूरी देण्यात येत आहे." | "हेलिकॉप्टर खरेदी करणेबाबत विमानचालन संचालनालयाने केलेल्या निविदा प्रक्रियेतील विहीत अटी व शर्तीनुसार अमेरिका येथील सिर्कोस्की इंटरनॅशनल ऑपरेशन, आयएनसी (लॉकहीड मार्टिन ची कंपनी) ६९०० मेन स्ट्रीट, पी.ओ.बॉक्स ९७२९ स्ट्रेटफोर्ड, कनेक्टीकट ०६६१५, यु.एस.ए. या उत्पादक कंपनीकडून S७६-D हे नवीन हेलिकॉप्टर टुल्ससहीत खरेदी करण्यासाठी व याप्रित्यर्थ एकूण यु.एस.डॉलर $१,८१,५८,८२५/- शी समतूल्य विनिमय दराने अंदाजे **($ १ = रु.८०/-) रु.१४५.२७ कोटी** (प्रचलित दरानुसार) खर्चास मंजूरी देण्यात येत आहे". असे वाचावे. |

| | | |
|---|---|---|
| २ | "या प्रित्यर्थ चालू आर्थिक वर्षी खालील नमुद उद्दिष्टांर्गत एकुण खरेदी रक्कमेच्या २० टक्के म्हणजेच $ ३६,३१,७६५ (अंदाजे रु.२५.४२ कोटी) रक्कम अथवा त्यावेळच्या प्रचलित परकीय चलन दरानुसार आगाऊ स्वरुपात अदा करण्यास व सदर रक्कम संक्षिप्त देयकाद्वारे खर्ची टाकण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे". | "या प्रित्यर्थ चालू आर्थिक वर्षी खालील नमुद उद्दिष्टांर्गत एकुण खरेदी रक्कमेच्या २० टक्के म्हणजेच US$ ३६,३१,७६५ **(अंदाजे रु.२९.०५ कोटी)** **(US$ १ =रुपये ८०)** रक्कम अथवा त्यावेळच्या प्रचलित परकीय चलन दरानुसार आगाऊ स्वरुपात अदा करण्यास व सदर रक्कम संक्षिप्त देयकाद्वारे खर्ची टाकण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे." असे वाचावे |
| ३ | कंपनीशी करण्यात येणाऱ्या करारनाम्यातील तरतूदीनुसार उर्वरित ८० टक्के रक्कम म्हणजेच $१,४५,२७,०६० (अंदाजे रु.१०१.६९कोटी) रक्कम अथवा त्यावेळच्या प्रचलित परकीय चलन दरानुसार अदा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर उर्वरित ८०% रक्कम जुलै,२०१८ च्या अधिवेशनात पुरवणी मागणी द्वारे अर्थसंकल्पित करण्यात येईल. | "कंपनीशी करण्यात येणाऱ्या करारनाम्यातील तरतूदीनुसार उर्वरित ८० टक्के रक्कम म्हणजेच $१,४५,२७,०६० **(अंदाजे रु.१६१.२२ कोटी)** रक्कम अथवा त्यावेळच्या प्रचलित परकीय चलन दरानुसार अदा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे." असे वाचावे |
| ४ | परिच्छेद क्र.४ मधील "रुपये २५.४२ कोटी" | परि.क्र.४ मध्ये ज्या ज्या ठिकाणी रुपये २५.४२ कोटी आहेत त्या ठिकाणी **रु.२९.०५** कोटी वाचावे. |

३. सिर्कोस्की या कंपनीस US$ या परकीय चलनातील भारतीय मूल्यानुसार २०% आगाऊ रक्कम रु.२५.४२ कोटी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अदा करण्यात आली असून परकीय चलनातील फरक लक्षात घेता या शुध्दीपत्रकानुसार फरकाची रक्कम रु.३.६३ कोटी (प्रचलित दरानुसार) सबंधित देयकाद्वारे संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ मध्ये अटी व शर्तीच्या आधारे अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

४. याबाबतचा होणारा खर्च मागणी क्र.ए-४, “२०७०-इतर प्रशासकीय सेवा (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) विमान चालन विषयक सल्लागार, महाराष्ट्र शासन (अनिवार्य) २०७० ०१५६” या लेखाशिर्षातंर्गत “५२-यंत्रसामुग्री व साधनसामग्री” या उद्दिष्टाखालील सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्प तरतूदीतून भागविण्यात यावा, व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०९१११५०७०३८७०७ असा आहे . हे आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Sandhya Ashok Bageshwar

Digitally signed by Sandhya Ashok Bageshwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d4a8d57e69da6499480bc974f18dca56ad5541c4795df9434c3e826318ec8ea, serialNumber=ba5a637883d7b445558182d1fd79c7e47a2d65e5094f71fb0ec8c5d23b0cc880, cn=Sandhya Ashok Bageshwar
Date: 2018.09.11 15:11:54 +05'30'

**( सं.अ.बागेश्वर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत माहितीसाठी सादर,**

१) प्रधान सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
३) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.२५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) महालेखापाल, ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) सिर्कोस्की इंटरनॅशनल ऑपरेशन, आयएनसी (लॉकहीड मार्टिन ची कंपनी) ६९०० मेन स्ट्रीट, पी.ओ.बॉक्स ९७२९ स्ट्रेटफोर्ड, कनेक्टीकट ०६६१५, यु.एस.ए.
१०) निवड नस्ती.